शासन ज्ञापने, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ एक-ते-पाच/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७, रद्द करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांक दुरूस्ती-१०१८/प्र.क्र.३६५/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २८ डिसेंबर २०१८.

<u>वाचा</u> :-

१) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ <u>एक</u> / पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.
२) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ <u>दोन</u>/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.
३) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ <u>तीन</u>/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.
४) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ <u>चार</u>/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.
५) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ <u>पाच</u>/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७.
६) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.पोप्रमा-०११७/ प्र.क्र.८०/ पोल-७, दिनांक ३१.०३.२०१७.
७) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. दुरूस्ती-१०१८/ प्र.क्र.३६५/ <u>एक</u>/ पोल-७, दिनांक ०६.१०.२०१८.
८) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. दुरूस्ती-१०१८/ प्र.क्र.३६५/ <u>दोन</u>/ पोल-७, दिनांक ०६.१०.२०१८.
९) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. दुरूस्ती-१०१८/ प्र.क्र.३६५/ पोल-७, दिनांक २९.१०.२०१८.
१०) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(१३)/ शा.२०६/ २०१८, दिनांक १०.०८.२०१८.
११) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(१३)/ शा.२९५/ १८, दिनांक ०७.१२.२०१८.

<u>**प्रस्तावना.**</u>

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील माहुल, चेंबूर, येथील नवीन पोलीस वसाहतीमधील, खालील तक्त्यातील स्तंभ (२) मधील इमारतींची अंतर्गत दुरूस्ती करणे व बाह्य भागांची साफसफाई करणे या कामांसाठी, स्तंभ (३) मधील शासन ज्ञापनांद्वारे स्तंभ (४) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण रु.१५,८२,८०,१२१/- इतक्या खर्चाच्या अंदाजांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्या होत्या:-

| अ.क्र. (१) | इमारतीचा क्रमांक (२) | शासन ज्ञापन क्रमांक व दिनांक (३) | मंजूर खर्चाचे अंदाज (४) |
|---|---|---|---|
| १. | इमारत क्र.२१ व २२ | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ एक/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.३,६४,१८,६२४/- |
| २. | इमारत क्र.२३ व २५. | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ दोन/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.३,६४,१८,६२४/- |
| ३. | इमारत क्र.२४, २६ व ६७. | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ तीन/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.४,६९,४७,४४७/- |
| ४. | इमारत क्र.२७, ६८ व ६९. | पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ चार/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७ | रु.३,८४,९५,४२६/- |
| **एकूण-** | | | **रु.१५,८२,८०,१२१/-** |

**२.** तसेच, उक्त वसाहतीतील अंतर्गत रस्ते व साफसफाईची कामे यांसाठी शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ पाच/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७, द्वारे रु.३६,९५,०१८/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

**३.** शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०११७/ प्र.क्र.८०/ पोल-७, दिनांक ३१.०३.२०१७, द्वारे उक्त कामांसाठी खालील तक्त्यात निर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण रु.१२,८३,५०,०००/- इतका निधी वितरित करण्यात आला होता:-

| अ. क्र. (१) | कामाचे नाव (२) | मंजूर खर्चाचे अंदाज (३) | वितरित निधी (४) |
|---|---|---|---|
| १. | इमारत क्र.२१ व २२ यांची दुरूस्ती | रु.३,६४,१८,६२४/- | रु.३,११,६३,७४५/- |
| २. | इमारत क्र.२३ व २५ यांची दुरूस्ती | रु.३,६४,१८,६२४/- | रु.३,११,६३,७४५/- |
| ३. | इमारत क्र.२४, २६ व ६७ यांची दुरूस्ती | रु.४,६९,४७,४४७/- | रु.३,११,६३,७४६/- |
| ४. | इमारत क्र.२७, ६८ व ६९ यांची दुरूस्ती | रु.३,८४,९५,४२६/- | रु.३,११,६३,७४६/- |
| ५. | अंतर्गत रस्ते व साफसफाईची कामे | रु.३६,९५,०१८/- | रु.३६,९५,०१८/- |
| **एकूण-** | | **रु.१५,८२,८०,१२१/-** | **रु.१२,८३,५०,०००/-** |

**४.** तथापि, उक्त सदनिकांमध्ये (सेवा निवासस्थाने) पोलीस कर्मचारी राहण्यास इच्छुक नसल्याने उक्त सदनिकांचा वापर सेवा निवासस्थानांऐवजी इतर प्रयोजनासाठी करणे आणि उक्त सदनिकांच्या दुरूस्तीसाठी वितरित करण्यात आलेला निधी हा इतर पोलीस निवासी/ कार्यालयीन इमारतींच्या दुरूस्तीसाठी वापरणे, यांबाबतचा प्रस्ताव पोलीस आयुक्त

कार्यालयाने सादर केला होता. त्या अनुसार, उक्त रु.१२,८३,५०,०००/- यापैकी एकूण रु.९,००,००,०००/- इतका निधी हा खालील तक्त्यातील स्तंभ (२) मधील कामांसाठी स्तंभ (३) मधील शासन निर्णयांद्वारे स्तंभ (४) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे फेरवितरित करण्यास मंजुरी देण्यात आली:-

| **अ.क्र.** (१) | **कामाचे नाव** *(शासन ज्ञापन क्रमांक व दिनांक)* (२) | **शासन निर्णय क्रमांक व दिनांक** (३) | **वितरित केलेला निधी** (४) |
|---|---|---|---|
| १. | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील वांद्रे, येथील पोलीस सेवा निवासस्थानांची संरचनात्मक दुरूस्ती करणे. *(क्र. दुरूस्ती-०८१८/ प्र.क्र.२७८/ पोल-७, दिनांक १२.०९.२०१८.)* | दुरूस्ती-१०१८/ प्र.क्र.३६५/ **एक**/ पोल-७, दिनांक ०६.१०.२०१८ | रु.६,००,००,०००/- |
| २. | मुंबई शहरातील राज्य शासकीय पुरातन वास्तुंचे *(antique homesteads)* सौंदर्य जतन करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या परिरक्षेखाली असलेल्या पुरातन वास्तुंना पूर्ववत करणेबाबतच्या कार्यक्रमाखाली, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाच्या पुरातन वास्तुची फेज-२ अंतर्गत कामे करणे *(क्र. संकीर्ण-०११८/ प्र.क्र.१२/ पोल-७, दिनांक १५.०९.२०१८)* | दुरूस्ती-१०१८/ प्र.क्र.३६५/ **दोन**/पोल-७, दिनांक ०६.१०.२०१८ | रु.१,००,००,०००/- |
| ३. | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई, येथील जुन्या पोलीस वसाहतीतील इमारत क्र.५, ७, १०, १२, २३, २५, २७, २९, | दुरूस्ती-१०१८/ प्र.क्र.३६५/पोल-७, दिनांक २९.१०.२०१८ | रु.२,००,००,०००/- |

| अ.क्र.<br><br><br>*(१)* | कामाचे नाव<br>*(शासन ज्ञापन क्रमांक व दिनांक)*<br>*(२)* | शासन निर्णय क्रमांक व दिनांक<br><br><br>*(३)* | वितरित केलेला निधी<br><br><br>*(४)* |
|---|---|---|---|
| | इमारत "जी" व "जे" यांच्या दुरूस्तीची विवक्षित कामे करणे *(क्र.* दुरूस्ती-०८१८/ प्र.क्र.३००/ पोल-७, *दिनांक २२.१०.२०१८.)* | | |
| **एकूण-** | | | **रु.९,००,००,०००/-** |

५. शासन ज्ञापने, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ एक-ते-पाच/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७, यांच्या द्वारे ज्या कामांसाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्या होत्या ती कामे करावयाची नसल्याने उक्त शासन ज्ञापने रद्द करण्याचा प्रस्ताव पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी सादर केला आहे. त्या अनुसार शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय.**

शासन ज्ञापने, गृह विभाग, क्र. पोप्रमा-०३१७/ प्र.क्र.२३१/ एक-ते-पाच/ पोल-७, दिनांक ३०.०३.२०१७, यांच्या द्वारे ज्या कामांसाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्या होत्या ती कामे करावयाची नसल्याने उक्त शासन ज्ञापने, याद्वारे, रद्द करण्यात येत आहेत.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२८१२५२४८५१२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad011844 93f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b953 22e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2018.12.28 13:04:34 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्य मंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), वित्त व नियोजन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (व्यय/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड फाईल, पोल-७.